ॐ सहनाववतु। सहनौ भुनक्तु। सहवीर्यं करवावहै। तेजस्वी नावधीतमस्तु। मा विद्विषावहै।।

ॐ शांतिः शांतिः शांतिः

कृष्ण यजुर्वेद तैत्तिरीय उपनिषद (2.2.2), कठोपनिषद् आणि केनोपनिषद् चा शांतीमंत्र आपल्या सर्वांच्या परीचयाचा आहे.

ॐ सहनाववतु सहनौ भुनक्तु। सहवीर्यं करवावहै। तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः

ॐ ब्रह्म अक्षर

सहनाववतु

सह +न्+औ+अवतु

सह+न्+आव+वतु

सह+नाव+वतु

सह नौ अवतु ह्याचा संधी कसा झाला असावा ते जाणून घ्यायला हवे.

6.1.78 अयादि सूत्र एचोऽयवायावः ह्या सूत्राची माहिती करून घेऊ.

एचः हा प्रत्याहार असून महेश्वर सूत्राप्रमाणे ए ओ ऐ औ हे चार वर्ण ह्या प्रत्याहार मध्ये दिसून येतात.

त्याचे अनुक्रमे अय अव आय आव असे आदेश होतात.

शे+अनम

श+ए+अनम =शयनम

भो+अनम

भ+ओ+अनम=भवनम

गै+अकः

ग+ऐ+अकः=गायकः

पौ+अकः

प+औ+अकः=पावकः

सह जोडीने अव्यय

नौ आम्ही अस्मद् द्वि. द्वि. व. /च. /ष.

अवतु अव धातू रक्षण करणे कर्तरि लोट् लकार प्र. पु. ए. व.

एचोःयवायावः

भुनक्तु भुज् धातू खाणे, उपभोग घेणे कर्तरि लोट् लकार प्र. पु. ए. व.

विर्यं शौर्य विर्य नपु. प्र. ए. व.

वीर्+यत्

वि+ईर् धातू स्फुरणे

करवावहै कृ धातू करणे लोट् लकार आत्मनेपदी उ. पु.

द्वि. व.

तेजस्वि सामर्थ्यवान तेजस्विन् नपु. प्र. ए. व.

नावधीतमस्तु

नौ+अधीतम्+अस्तु

नौ अस्मद् द्वि. द्वि. व. /च. /ष.

अधीतम् उमजलेले अधीत (अधिकारपूर्वक) +इ धातू जाणे क्त प्रत्यय प्र. ए. व.

अस्तु अस् धातू लोट् लकार प्र. पु. ए. व.

मा नको (परावृत्त) अव्यय

विद्विषावहै वि+द्विष् धातू द्वेष करणे कर्तरि लोट्लकारः उ. पु. द्वि. व.

शांति शम् धातू क्तिन् प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

गुरू आणि शिष्य दोघांनी व्यक्त केलेले हे आव्हान सर्वांनीच आत्मसात करण्यासारखे आहे. ह्या श्लोकातील

सह हा शब्द समृद्धी, साकल्य, सामर्थ्य अशा निरनिराळ्या छटा दाखवतो. आताच्या काळात कोणत्याही दोन व्यक्ती ज्या एकमेकांना पूरक आहेत अशांनी हा मंत्र अंगिकारायला हरकत नाही.

लहान वयात आईवडिलांनी आपल्या मुलांना विद्यार्जन  करण्यासाठी मोठ्या विश्वासाने गुरूगृही पाठवायचे. सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत सर्व गोष्टी शिष्य गुरूकडून आत्मसात करणार. निरनिराळ्या पार्श्वभूमी असलेल्या घरातून आलेल्या ह्या मुलांचे गुरू माता पित्याप्रमाणे लालन-पालन करून त्यांना योग्य, उपयुक्त अशी जीवनकौशल्ये शिकवणार. व्यक्तीगत विकास करत असताना सामाजिक मूल्ये सुद्धा शिकवून सामाजिक उन्नती घडवायचा प्रयत्न करणार.

प्रत्येक शिष्याची योग्यता आणि त्याचा कल पाहून त्याला विद्या द्यायची. त्याच्या दुखण्याखुपण्याची काळजी वहायची. सर्वांना सारखेच प्रेम द्यायचे. हे काही सोपे काम नाही. इतके सर्व करताना शिष्याप्रती विलक्षण आत्मीयता हवी आणि धाक सुद्धा. आपल्या संस्कृतीत गुरूला गुरूमाऊली असे संबोधले जाते ते ह्याच मुळे.

विद्यादान करता करता गुरूची सुद्धा प्रगती होत असते ही कल्पना येथे मांडली आहे. एक वेळ अशी सुद्धा यावी, जेव्हा शिष्य गुरू पेक्षा सरस ठरत आहे. ह्याला सुद्धा येथे मान्यता आहे.

अशा गुरू शिष्यानी एकत्र केलेले आवाहन म्हणजे हा मंत्र.

ॐ-सह-नाववतु

येथे गुरू शिष्य एकमेकांसाठी आवाहन करत आहेत की त्यांचे परमेश्वराने रक्षण करावे.

अव् धातूच्या अर्थाच्या अनेक छटा आहेत. आपल्या मनातील पंतोजींची प्रतिमा ह्या मंत्रात पूर्णपणे पुसली गेली आहे.

अप्रत्यक्षपणे मी फक्त विद्यादानाचे माध्यम आहे अशी भूमिका ह्या मंत्रात गुरूंनी घेतलेली दिसते. आम्हा दोघांचे रक्षण होऊ दे असे कोणाला म्हटले आहे? ह्या मंत्राची सुरवात ॐ ह्या अक्षरापासून झाली

आहे. ब्रह्मस्वरूप ॐ (असे श्रीमद्भगवद्गीतेतील 8 व्या अध्यायात सांगितले आहे) ने आम्हा दोघांचे रक्षण करू दे. ॐकार मंगलकारी असतो.

ॐकारश्चाथशब्दश्च द्वावेतौ ब्रह्मणः पुरा । कण्ठं भित्त्वा विनिर्यातौ तस्मान्माङ्गलिकावुभौ ।। ॐकार आणि अथ हे दोन्ही शब्द ब्रह्मदेवांनी उच्चार करण्याची देखील वाट पाहू शकले नाहीत. सरळ त्याच्या कंठाचा भेद करून बाहेर पडले. ब्रह्माच्या कंठातून बाहेर पडले म्हणून दोन्हीही मांगलिक.

ज्ञानेश्वर माऊलींनी सुद्धा ॐ हे एकाक्षर ब्रह्म आहे असे म्हटले आहेच. आता कसे रक्षण करावे? आम्हा दोघांचेही ब्रह्मतत्वाने रक्षण करू दे. म्हणजे एक प्रकारची सांघिक भावना येथे प्रदर्शित केली आहे. त्यानंतर म्हटले आहे,

(ॐ) सहनौभुनक्तु

भुज् धातू पासून तयार झालेला शब्द भुनक्तु म्हणजे आम्हा दोघांचे सारखेच पालनपोषण होऊ दे.

(ॐ) सहवीर्यं करवावहै

वीर्य ह्या शब्दाचे सुद्धा अनेक अर्थ आहेत. वीरता, शौर्य ह्या अर्थाशिवाय प्रेरणा देणे, स्फुरण चढणे वगैरे. थोडक्यात आम्हा दोघांनांही एकत्र चांगले काम करण्याची स्फूर्ती मिळू दे.

काम सुरू करण्यापूर्वी अशी वातावरणनिर्मिती आवश्यक असतेच.

तेजस्वि नावधीतमस्तु

तेज, पंचमहाभूतांपैकी एक तत्व, कोणाची प्रतिमा आपल्या प्रखर ज्ञानामुळे उजळून निघाली असेल तर कोणी आपल्या विशेष कर्तृत्वामुळे तेजाळून निघाले असतील.

अशी उत्तुंग भरारी आम्हा दोघांनाही मारता येऊ दे. आमच्या दोघांचे असे हे प्रयत्न अधीत होऊ दे. आम्हाला आमच्या कार्यात अधिकारप्राप्ती होऊ दे, आम्ही तेजस्वी होऊ दे.

आता शेवटचे वाक्य अतिशय महत्त्वाचे. इतके सर्व कष्ट उपसल्यानंतर, उत्तुंग झेप घेतल्यानंतर, आमच्या दोघांच्याही मनात एकमेकांबद्दल अजिबात ईर्षा उत्पन्न न होऊ दे. 'मा' हे अव्यय नुसत्या नकारापेक्षा, परावृत्त करण्याच्या अर्थाने वापरातात. म्हणजे जणू काही आमची मनाची जडणघडण अशी ठाम असू दे, जेथे आमच्या मनात ईर्षेचा लवलेश सुद्धा नसेल.

ॐ शांतिः शांतिः शांतिः।।